जीवनदायी आरोग्य योजनेअंतर्गत खाजगी रुग्णालयांना मान्यता देण्याबाबत..
अष्टविनायक हॉस्पीटल, नविन पनवेल

**महाराष्ट्र शासन**
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय जीआयो २००९/प्र.क्र.१६४/आरोग्य-६
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- ७ जानेवारी, २०११

वाचा - १) शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. जिआयो १०९७/प्रक्र २४७/ आरोग्य-३, दिनांक ६ नोव्हेंबर, १९९७
२) शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.जिआयो २००२/२६७/आ.३, दि. १० जुलै, २००६
३) शासन निर्णय क्र. जिआयो २००७/प्रक्र १२८/आ. ६, दिनांक ४ जानेवारी, २००८
४) शासन निर्णय क्र. जिआयो २००७/प्रक्र १२८/आ.६, दिनांक २ एप्रिल, २००८
५) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे पत्र क्र. संआसे/जीआयो/अष्टविनायक हॉस्पीटल/शामा/ टे-११/कक्ष-३/०९, दिनांक ४ ऑगस्ट, २००९.

शासन निर्णय :- **अष्टविनायक हॉस्पीटल, नविन पनवेल** या खाजगी रुग्णालयाला जीवनदायी आरोग्य योजनेतंर्गत साधनसामुग्री (डिस्पोजेबल) व आवश्यक तेथे जीवनावश्यक (लाईफ सेव्हींग) किंमती औषधे यावरील खर्च भागविण्यासाठी रु. १,५०,०००/- (रु. एक लाख पन्नास हजार फक्त) या आर्थिक मर्यादेत **मेंदूविकार, मज्जासंस्था विकार आणि कर्करोग या आजारांवर शस्त्रक्रिया व उपचार करण्यासाठी शासनाची मान्यता देण्यात येत आहे.** सदर मान्यता नविन स्वरुपातील जीवनदायी आरोग्य योजना रायगड जिल्हयामध्ये सुरु होईल त्या दिनांकापर्यंतच्या कालावधीसाठी देण्यात येत आहे. नविन जीवनदायी योजना सुरु झाल्यानंतर सदर रुग्णालयाची जीवनदायी आरोग्य योजनेतंर्गत उपचार व शस्त्रक्रियांसाठी दिलेली मान्यता नविन योजनेच्या तरतूदींच्या अधिन राहील.

२. या रुग्णालयाला पुढील मार्गदर्शक तत्वानुसार रुग्णांवर उपचार करणे आवश्यक राहील.

अ) उपसंचालक, आरोग्य सेवा मंडळ, ठाणे यांच्या शिफारशीने संदर्भित केलेले दारिद्रय रेषेखालील रुग्ण, शालेय आरोग्य तपासणी योजनेतील जिल्हा परिषद शाळांमधील इयत्ता १ ली ते १० वी पर्यंतचे विद्यार्थी, राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य पोषण अभियान, औरंगाबाद यांच्या संनियंत्रणाखालील तसेच एकात्मिक बाल विकास योजनेतील ० ते ६ वर्षे वयोगटातील रुग्ण बालक/विद्यार्थी आणि राज्यातील स्वातंत्र्य सैनिक/स्वातंत्र्य सैनिकांच्या विधवा या योजनेतंर्गत उपचारास पात्र राहतील.

ब) सदर रुग्णालयाला जीवनदायी आरोग्य योजनेअतंर्गत करण्यात येणा-या शस्त्रक्रियेसाठी रुपये १,००,०००/- च्या आर्थिक मर्यादेत अनुदान संबंधित जिल्हा रुग्णालयाचे जिल्हा शल्यचिकीत्सक/संबंधित वैद्यकीय महाविद्यालयाचे व रुग्णालयाचे

वैद्यकीय अधीक्षक यांचेकडून मंजूर करण्यात येईल. रु. १,००,०००/- च्या पेक्षा अधिक खर्च असल्यास पूर्ण रकमेच्या खर्चास उप संचालक, आरोग्य सेवा, ठाणे यांची मान्यता घेण्याची कार्यवाही संबंधीत जिल्हाशल्यचिकीत्सक व वैद्यकीय महाविद्यालय / रुग्णालयाच्या वैद्यकीय अधीक्षकांनी करावी. मंजूर रकमेपेक्षा जादा खर्च संबंधित रुग्णालयाला सोसावा लागेल.

क) या रुग्णालयाने योजनेअतंर्गत किमान दरमहा ५ शस्त्रक्रिया करणे अपेक्षित आहे.

ड) रुग्णालयामार्फत १० % मोफत व १० % सवलतीच्या दरात उपचार करणे आवश्यक राहील.

इ) या खाजगी रुग्णालयात आवश्यक अनुदान संबंधित समितीमार्फत उपलब्ध करण्यात येईल. (शासन निर्णय क्र.जिआयो २००७/प्र.क्र.१२८/आ-६, दिनांक २ एप्रिल २००८ चे विवरणपत्र-अ) या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र व हिशोब उपसंचालकांकडून वेळोवेळी प्राप्त झाल्यानंतर पुढील अनुदान उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही करण्यात येईल.

३. सदर शासन निर्णय निर्गमित केल्याच्या दिनांकापासून लागू होईल. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०११०१०७१८३९३४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( अ. सं. फडतरे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,
मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय मुंबई
मा. उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. मंत्री, आरोग्य यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
मा. राज्यमंत्री, आरोग्य यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
सर्व मंत्री / राज्यमंत्री, यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
सर्व विधानमंडळ सदस्य, विधान भवन, मुंबई
संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय (५ प्रती)
संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई
प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ संचिवालय (१० प्रती)
सह संचालक, आरोग्य सेवा (वैद्यकीय), मुंबई
सह संचालक, आरोग्य सेवा (आरोग्य), पुणे

उप संचालक, आरोग्य सेवा , परिमंडळे (सर्व)
जिल्हा शल्यचिकित्सक, (सर्व)
जिल्हाधिकारी, रायगड अलिबाग
जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व)
जिल्हा माहिती अधिकारी, रायगड अलिबाग
महालेखापाल १/२ (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड अलिबाग
बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंठ, आझाद मैदान, मुंबई ४०० ००१
भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ., बॅरेक क्रं.१ योगक्षेम समोर, वसंतराव भगवान चौक, नरीमन पॉईंट, मुंबई ४०० ०२०
भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभवन, एस.व्ही. पटेल रोड, मुंबई ४०० ००४
भारतीय कम्युनिस्ट पार्टी, (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई ४०० ०१३
इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय),समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई ४०० ०२५
राष्ट्रवादी कॉंग्रेसपार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई ४०० ०२१
शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई ४०० ०२८
अष्टविनायक हॉस्पीटल, प्लॉट नं. १०, सेक्टर-६, खांदा कॉलनी, नविन पनवेल (पश्चिम), नवी मुंबई ४१० २०६
निवडनस्ती